**महापेक्स २०२५ प्रदर्शनात सहभागी करण्याकरीता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२५/प्र.क्र.४३(९४६७६२)/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०३ मार्च, २०२५

**संदर्भ** :- पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२५/ प्र.क्र.४३(ई.नं.९४६७६२)/सां.का.४, दि. २९ जानेवारी, २०२५.

**प्रस्तावना :-**

महापेक्स २०२५ उपक्रम दि. २२ ते २५ जानेवारी, २०२५ या कालावधीत वर्ल्ड ट्रेड सेंटर, मुंबई येथे नियोजित आहे. सदर महोत्सव/उपक्रमामध्ये संपूर्ण महाराष्ट्रातील दुर्मिळ आणि अनोख्या मुद्रांक संग्रहांचे वैविध्यपूर्ण प्रदर्शन आहे. तिकिट/मुद्रांक संग्रहाच्या संस्कृतीला चालना देण्यासाठी सर्व वयोगटांसाठी तयार केलेल्या पत्रलेखनावर कार्यशाळा आणि स्पर्धा आयोजित करण्यात येणार आहे. त्याच पार्श्वभुमीवर पोस्ट तिकिट/स्टॅम्पद्वारे विविध महनीय व्यक्तीचा/उपक्रमाचा इतिहास, कला आणि संस्कृती दर्शवणारे प्रदर्शन तसेच विभागाच्या योजनांची १० सेकंदाची जाहिरात या प्रदर्शनात प्रत्येक १० मिनिटांनी एकदा एलईडी स्क्रीनवर प्रदर्शित करण्याकरीता येणाऱ्या खर्चास उपर्निर्दिष्ट सदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता सदर कार्यक्रम आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महापेक्स-२०२५ प्रदर्शनात सहभागी होण्यासाठी रुपये ३,००,०००/- (अक्षरी रुपये तीन लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०२), राज्य, नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७)-५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला,

उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व दि. १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. १२५/२०२५, व्यय १५, दि. १८/०२/२०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०३१४४२५४७३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

BALASAHEB
ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.03 14:44:21 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४